महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा परीक्षा २०१९ मधील जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-ब (राजपत्रित) या पदावर परिविक्षाधीन उमेदवारांना तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश क्र :- आस्थाप-२०२२/ प्र.क्र.२९६/जल-२**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: १२ जून, २०२४

**संदर्भ :** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. ३७४ (२) /स्थापत्य/२०१९/१९, दि.१५.०६.२०२२
२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या-८, दि.२२.०६.२०२१
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेपुर-११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दि.१३.०२.२०२३
५) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्र. चापअ-१०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दि.२६.०८.२०१४
६) अपर पोलीस अधीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, अमरावती यांचे कार्यालयाचे पत्र क्र.जा.क्र.पाअ/अप/ॲकब्यु/सीआर/७१४/बुलढाणा/२०१७/ अपीलमाहिती/२८९२/२०२३, दि.११.१०.२०२३

**शासन आदेश-**

महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा परीक्षा २०१९ मधील जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-ब (राजपत्रित) पदावरील नियुक्तीसाठी सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धा परीक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांच्या दि.१५/६/२०२२ च्या पत्रान्वये, शिफारस प्राप्त १९४ उमेदवारांपैकी श्री.राहुल विलास पवार यांचेवर लाचलुचपत प्रतिबंध अधिनियमांतर्गत गुन्हा दाखल होता, त्यामुळे त्यांना नियुक्ती देण्यात आली नव्हती. लाचलुचपत प्रतिबंध अधिनियमांतर्गत गुन्हाच्या अनुषंगाने उक्त संदर्भ क्र.७ येथील प्राप्त अहवालानुसार श्री.पवार यांना मा.विशेष न्यायालय, बुलढाणा यांच्या दि.२९/०४/२०२३ रोजीच्या निकालाद्वारे निर्दोष मुक्त करण्यात आले आहे. सदर आदेशाविरुध्द कोणतेही अपील दाखल केलेल नाही. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२६/०८/२०१४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये, शासन सेवेत नियुक्ती करताना चारित्र्य पडताळणी संदर्भातील प्रकरणाबाबत निर्णय घेण्याकरिता गठीत केलेल्या समितीसमोर श्री.पवार यांच्या नियुक्तीबाबतचा प्रस्ताव दि.३०/०१/२०२४ रोजीच्या बैठकीत फेरसादर करण्यात आला, त्यामध्ये समितीने श्री.पवार यांच्या नियुक्तीस मान्यता दिली आहे. त्यानुसार, श्री.पवार यांना जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-

"ब" (राजपत्रित) या पदावर सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-१६ (रूपये ४४९००-१४२४००/-) मध्ये तात्पुरत्या नियुक्तीस परिच्छेद क्र.६ मधील नमूद अटी/शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत असून त्यांची सरळसेवेने पदस्थापना सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ. क्र. | मलोआ गुणवत्ता क्रमांक | नाव | उमेदवाराचा प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | नियुक्तीसाठी प्रस्तावित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २१/२०१९ | श्री.राहुल विलास पवार | इ.मा.व. | खुला | अमरावती | उपविभागीय जलसंधारण अधिकारी यांचे कार्यालय मृद व जलसंधारण उपविभाग, यवतमाळ |

२. श्री.पवार यांनी हे आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत पदस्थापनेच्या ठिकाणी नियुक्तीचा स्विकार करणे आवश्यक आहे. सदरहू कालावधीत उमेदवारांनी तात्पुरती नियुक्ती स्विकारली नाही तर त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता या विभागाच्या/महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवडसूचीतून कमी करण्यात येईल.

३. श्री.पवार हे शासन निर्णयाच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत उक्त पदावर हजर झाले नाहीत अथवा, त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त न झाल्यास त्यांची करण्यात आलेली नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही, असे समजून त्यांच्या नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. याबाबतचा अहवाल संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास दिनांक १५.०७.२०२४ पर्यंत सादर करावा. सेवेत दाखल झालेल्या उमेदवारांनी आपला हजर झाल्याचा अहवाल तात्काळ संबंधित अधिकारी तसेच शासनास सादर करावा.

४. श्री.पवार यांची सदर तात्पुरती नियुक्ती ही दोन वर्षांचा परिविक्षाधीन काळ समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या अधीन राहील.

५. श्री.पवार या परिविक्षाधीन जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) गट-"ब" (राजपत्रित) यांचा प्रशिक्षण कार्यक्रम शासनाद्वारे सुरु होईपर्यंतच्या कालावधीकरीता उमेदवारांना क्षेत्रीय कामकाज करता यावे याकरीता संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांनी त्यांच्या अधिनस्त उपविभागीय कार्यालयात नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांना त्यांचे कामकाज करण्याच्या दृष्टीने आवश्यक प्रशिक्षण द्यावे. पायाभूत प्रशिक्षणासंदर्भात यथावकाश कळविण्यात येईल.

६. वरीलप्रमाणे श्री.पवार या पात्र ठरलेल्या उमेदवारास देण्यात आलेली तात्पुरती नियुक्ती ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहील :

१. शिफारस प्राप्त उमेदवाराच्या शैक्षणिक अर्हता, वयोमर्यादा, जात प्रमाणपत्र इ. मूळ कागदपत्रांच्या वैधतेच्या अधीन राहून सदर तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

२. श्री.पवार यांनी हिंदी व मराठी भाषा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा त्यांना भाषा परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या प्रचलित नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

३. मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांच्या बाबतीत प्रचलित नियमातील तरतुदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. मागासवर्गीय उमेदवारांनी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र शासनास व संबंधित उमेदवारांची नियुक्ती करण्यात आलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार संबंधित उमेदवारांच्या मुळ सेवापुस्तकात नोंद घेण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी. (लागू असल्यास)

४. मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर (अ.जा., अ.ज., वि.जा.(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड), वि.मा.प्र., इ.मा.व.) शिफारस झालेल्या तसेच आरक्षित प्रवर्गातील असूनदेखील आयोगाने ज्यांची खुला प्रवर्गातून शिफारस केलेली आहे अशा नियुक्ती दिलेल्या मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यास, त्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या आत जात प्रमाणपत्राची वैधता, जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून करुन घेणे आवश्यक राहील. नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयाने संबंधित मागासवर्गीय उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्राच्या अनुषंगाने आवश्यक ती कागदपत्रे जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करावी. विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास संबंधित उमेदवारांच्या सेवा प्रचलित नियमानुसार समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल. (लागू असल्यास)

५. श्री.पवार यांना सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान), शासन पुरक पत्र क्र.मातंसं-२०१२/प्र.क्र.२७७/३९, दिनांक ०८/०१/२०१८ मधील परिच्छेद क्र.१.६ मधील तरतुदीनुसार संगणक अर्हता परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे.

६. श्री.पवार यांनी विहीत विभागीय परिक्षा परिविक्षाधीन कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच परिविक्षाधीन कालावधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास किंवा कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा त्यांचे काम योग्य अथवा अनुरूप न आढळल्यास तसेच गैरवर्तणुकीची/गैरव्यवहाराची बाब परिविक्षाधीन कालावधीत निदर्शनास आल्यास अथवा इतर कारणांमुळे ते या पदासाठी योग्य नसल्याचे आढळून आल्यास, त्यांच्या सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

७. श्री. पवार यांना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) लागू राहील. तसेच यासंदर्भातील वित्त विभाग / साप्रविने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय लागू राहतील.

८. प्रशिक्षणार्थींना तीन संधीमध्ये प्रशिक्षण पूर्तता परिक्षा पास होणे बंधनकारक राहील. परिक्षेस पास होण्यासाठी किमान ५० टक्के गुणांची आवश्यकता असेल.

९. व्यावसायिक परिक्षा (Professional Exam) व प्रशिक्षण पूर्तता परिक्षेचा संबंध नसेल. प्रचलित नियमानुसार व्यावसायिक परिक्षा घेण्यात येईल व सेवाप्रवेश नियमानुसार विहीत

केलेली विभागीय परिक्षा विहीत संधीत उत्तीर्ण करावी लागेल, तसे न केल्यास त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

१०.श्री.पवार यांचा परिविक्षाधीन कालावधी दोन वर्षांचा राहील. सदर उमेदवार परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करील व या कालावधीत शासनाकडून विहित करण्यात येईल असे प्रशिक्षण घेईल व विहित केलेली विभागीय परिक्षा उत्तीर्ण होईल, जर सदर उमदेवारांनी परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला नाही किंवा विभागीय परिक्षा उत्तीर्ण केली नाही किंवा प्रशिक्षण पुर्ण केले नाही किंवा काम करण्यास सुयोग्य आढळून आली नाही तर अशा उमेदवाराच्या सेवा पूर्व सूचनेशिवाय समाप्त करण्यात येतील.

११.श्री.पवार यांना शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास, त्यांना शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ लेखी सूचना किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. यासंदर्भातील राजीनामा स्विकारण्याचे अधिकार केवळ नियुक्ती प्राधिकारी (शासन) यांना असतील. क्षेत्रिय कार्यालयांनी परस्पर प्रशिक्षणार्थ्यांचा राजीनामा स्विकृत करु नये किंवा मंजूर करु नये. तथापि, राजीनामा दिल्यानंतर पुन्हा राजीनामा मागे घ्यावयाचा असल्यास, त्यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो २०१९/प्र.क्र.४७०/सेवा-४, दिनांक ०९.०५.२०२२ मधील तरतूदी लागू राहतील. मात्र, गैरवर्तणूक, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी सूचना देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

१२. महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३.०९.२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतूदीनुसार प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी प्रशिक्षणार्थीने सक्षम प्राधिकाऱ्यास बंधपत्र लिहून द्यावे लागेल. जर एखादा प्रशिक्षणार्थी बंधपत्रात नमूद केलेल्या कालावधीत नोकरी सोडत असेल तर बंधपत्रात नमूद केलेली रक्कम प्रशिक्षणार्थीकडून वसूल करुन संबंधित प्राधिकाऱ्याला प्रथम शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल. त्यानुसार प्रत्येक उमेदवाराला रुजू झाल्यानंतर संबंधित कार्यालयाकडे विहित नमुन्यातील बंधपत्र भरुन सादर करणे बंधनकारक राहील व त्याची प्रत शासनास सादर करावी.

१३.श्री.पवार यांनी रुजू होताना छोटे कुटुंबाबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

१४.सदर नियुक्ती आदेशानुसार, उमेदवारास विहित कालावधीमध्ये रुजू होणे शक्य नसल्यास व तसे लेखी निवेदन सादर केल्यास मुदतवाढ देणेबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ नुसार कार्यवाही करण्यात येईल.

७. उक्त नमूद उमेदवाराने विशिष्ट ठिकाणी सविस्तर पदस्थापना मिळविण्यासाठी खासदार/ आमदार/लोकप्रतिनिधी/खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित उमेदवाराविरूद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१२१३००५४७१२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YUVRAJ BAYAJI
AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2024.06.12 13:13:52 +05'30'

**( यु.ब.अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, महाराष्ट्र राज्य.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
७. आयुक्त, मृद व जलसंधारण, वाल्मी, छ.संभाजीनगर.
८. सर्व विभागीय आयुक्त पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती/ छ.संभाजीनगर.
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य
१०.अपर आयुक्त जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे/नागपूर
११.सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी पुणे/ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती/ छ.संभाजीनगर.
१२.सर्व प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी पुणे/नागपूर/ छ.संभाजीनगर.
१३.सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
१४.सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) विभाग,
१५.सर्व उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
१६.सर्व उपविभागीय जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) विभाग,
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१८. श्री.राहुल विलास पवार, हनुमान गल्ली, मु.पो.पाडळी, ता.बुलढाणा, जि. बुलढाणा-४४३००१ यांना ईमेलव्दारे /whats app व्दारे
१९.सर्व कार्यासने (मृद व जलसंधारण विभाग)
२०. निवड नस्ती